**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-१०१७/प्र.क्र.११५/१४-अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: १० सप्टेंबर, २०२०

**संदर्भ** :- १) सा.प्र.वि. शासन आदेश क्र.कअनि-१११७/प्र.क्र.३६/१४-ब, दि.०२-०५-२०१७.

२) सा.प्र.वि. शासन आदेश क्र.प्रतिनि-२५१८/प्र.क्र.१००/१४-अ, दि.०४-०७-२०१८.

३) महाराष्ट्र राज्य लोकसेवा हक्क आयोग यांचे कार्यालयीन आदेश क्रमांक अकनि-२०१८/प्र.क्र.०८/मुसेहआ, दिनांक २८-०८-२०२०

**शासन आदेश**

श्रीमती श्वे.स.सावंत, लिपिक-टंकलेखक यांच्या सेवा राज्य लोकसेवा हक्क आयोग यांच्याकडे संदर्भाधिन क्रमांक १ वरील आदेशान्वये प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात आलेल्या होत्या. संदर्भ क्रमांक २ वरील आदेशान्वये त्यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्यात आलेली होती. संदर्भ क्रमांक ३ वरील आदेशान्वये महाराष्ट्र लोकसेवा हक्क आयोग कार्यालयाने श्रीमती सावंत यांना दिनांक ३१-०८-२०२० (म.नं.) पासून प्रतिनियुक्तीच्या पदावरुन कार्यमुक्त केलेले आहे. दिनांक ०१-०९-२०२० रोजी मुंबई शहर जिल्हयात स्थानिक सुट्टी असल्यामुळे श्रीमती सावंत या दिनांक ०२-०९-२०२० रोजी या विभागाकडे हजर झालेल्या आहेत.

२. श्रीमती श्वे.स.सावंत, लिपिक-टंकलेखक या प्रतिनियुक्तीवरुन परत आल्यानंतर त्यांची पदस्थापना उद्योग, ऊर्जा व कामगार विभागात लिपिक-टंकलेखक पदावर करण्यात येत आहे.

३. श्रीमती श्वे.स.सावंत, लिपिक-टंकलेखक यांनी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागात तातडीने हजर व्हावे.

४. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने श्रीमती सावंत यांना हजर करुन घेतल्यानंतर त्याबाबतच्या आदेशाची प्रत या विभागास सादर करावी.

५. श्रीमती श्वे.स.सावंत, लिपिक-टंकलेखक यांचा दिनांक ०१-०९-२०२० (म.पू.) पासून ते आदेशाच्या दिनांकापर्यंतचा कालावधी सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्याची कार्यवाही म.ना.से.(सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ च्या नियम ९(१४)(एफ) नुसार व वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक ०२-०६-२००३ मधील तरतुदीनुसार उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने करावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००९१०१२१७००२५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.09.10 12:22:04 +05'30'

(ग. भि. गुरव)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित लिपिक-टंकलेखक (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत).

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग/उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय.
२. सह/उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग/उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय.

(संबंधित मंत्रालयीन विभागांमार्फत)

३. निवड नस्ती/संग्रहार्थ (कार्यासन १४-अ).